**औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहातील उत्तर बाजुच्या मुख्य तटभिंतीची दुरुस्ती, पुनर्बांधणीसाठी प्रशासकीय मंजुरी देणेबाबत.**

## *महाराष्ट्र शासन*

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीएलडी ३६९४/२(५७)/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२, दि. २७ फेब्रुवारी, २००४

पहा :- १) कारागृह उप महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र क्र. बीएलडी/१६९४/२४८२/कक्ष-३ पुणे-१, दि. ५.१.२०००

२) शासन निर्णय गृह विभाग क्र. बीएलडी-३६९४/२(५७)/ पीआरएस-२, दि. २९ जानेवारी, १९९७.

शासन निर्णय :- औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहातील उत्तर बाजुच्या तटभिंतीची दुरुस्ती / पुनर्बांधणी करण्याकरिता उपरोक्त दि. २९.१.१९९७ च्या शासन निर्णयान्वये रु. १२,०४,७००/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता दिली होती. त्यावेळी सदर तटभिंतीचे काम हे दगडी बांधकामात करावयाचे होते परंतु तेथे त्यावेळी पाण्याची दलदल लागली असल्याने अशा परिस्थितीमध्ये कारागृहाची तटभिंत ही दगडी बांधकामात न करता त्याऐवजी आर.सी.सी. भिंत बांधण्याचे त्यावेळच्या कार्यकारी अभियंता व उप अभियंता यांनी प्रस्तावित केले होते. त्यावेळी दगडी भिंत बांधली असती तर दलदलीमुळे ती पडण्याची शक्यता होती व खर्च वाया गेला असता. या बाबींचा तसेच भविष्यामध्ये कारागृहाच्या सुरक्षिततेमध्ये धोका न होण्याच्या दृष्टीने सदर भिंतीचे दगडी बांधकाम रद्द करुन त्याऐवजी आर.सी.सी. भिंत बांधण्यासाठी रुपये ७६,६६,८००/- एवढ्या सुधारीत खर्चाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह हे अतिसुरक्षा कारागृह असून तेथे अतिरेकी, खतरनाक टोळीतील इत्यादी ६०० न्यायाधिन बंदी / शिक्षा लागलेले बंदी ठेवण्यात येतात. सदर कारागृहाची तटभिंत एका बाजूला कलंडलेली असून ती केव्हाही पडण्याची शक्यता असल्याने कारागृहाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने या तटभिंतीची (मुख्य भिंत) पुनर्बांधणी करणे गरजेचे आहे. या बांधकामाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजना (७५:२५) या योजनेतर योजनेत तसेच राज्य योजनांतर्गत योजनेत समाविष्ट करण्यात आलेला आहे. या सर्व बाबींचा व कारागृहाची सुरक्षा या बाबी विचारात घेऊन औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहातील उत्तर बाजुच्या तटभिंतीची (मुख्य भिंत) दुरुस्ती / पुनर्बांधणी करण्याकरीता यापूर्वी विभागाच्या समक्रमांकीय दि. २९ जानेवारी, १९९७ रोजी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करुन त्याऐवजी आता रुपये ७६,६६,८००/- (रुपये शहात्तर लाख

सहासष्ट हजार आठशे फक्त) इतक्या खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रक व नकाशास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

३. प्रस्तावित बांधकामावर होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०२) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (दत्तमत) (२०५६-०१८-२)" तसेच मागणी क्र. एच-८ ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ५०१ बांधकाम, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-, प्रमुख बांधकामे, (००)(१०) तुरुंग (४०५९०११७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २००३-२००४ च्या वित्तीय वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा. केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत केलेल्या खर्चाची माहिती विहित विवरणपत्रात केंद्र शासनास पाठविण्यासाठी या विभागास पाठवावी.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग यांचे सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर-४/२००४/व्यय-८, दि. ५.२.२००४ नुसार दिलेल्या मंजुरीन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,
- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद.
- अधिक्षक, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह, औरंगाबाद.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / [illegible]
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- नियोजन विभाग, का. १४११, मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.